राष्ट्रीय कल्याण निधी या केंद्र पुरस्कृत योजनेखाली मच्छिमारांसाठी घरे व कुपनलिका बांधण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र मत्स्यवि ३६०१/१६०८/(१००)/पदुम १४
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ ऑक्टोबर, २००१

वाचा : १) अवर सचिव, भारत सरकार, कृषि मंत्रालय, पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभाग, नवी दिल्ली यांचे क्र. १२०३५/१/२००१ - एफवाय (डब्ल्यू यु) दिनांक २४ मे, २००१ चे पत्र
२) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे क्र. मत्स्य/(सा)/०७२१०१/२९-२००१ दि. ११/०५/२००१ चे पत्र

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय कल्याण निधी या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत, मच्छिमारांसाठी आदर्श मच्छिमार गावाचा विकास करण्याच्या दृष्टीने मच्छिमारांसाठी घरे बांधण्यासाठी रु. ३५,०००/- इतक्या मर्यादेपर्यंत (प्रती घर) आणि प्रत्येक मच्छिमार गावात प्रती २० घरकुलामागे १ कुपनलिका बांधण्यासाठी रु. २५,०००/- (प्रती कुपनलिका ) अर्थसहाय्य देण्याची योजना राबविण्यात येत. सदर अर्थसहाय्य केंद्र व राज्य शासनाकडून ५०:५० या प्रमाणात देण्यात येते. सदरची योजना सन २००१-०२ मध्ये विद्यमान तत्वावर पुढे चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पाबाबतचे वित्तिय मंजूरीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

हे आदेश नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. प्र.क्र. ४७९/व्यय-१ दिनांक ५ ऑक्टोबर,२००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GR-20020122130737000-04000.

(सुजाता दि. ढोले)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी, धुळे/बीड
मुख्य कार्यकारी अधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, धुळे/बीड
प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, नाशिक/औरंगाबाद
सहाय्यक मत्स्यव्यवसाय संचालक, धुळे/बीड
जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी,धुळे/बीड
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, १ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
निवासी लेखा अधिकारी, मुंबई
लेखाधिकारी, आयुक्त मत्स्यव्यवसाय कार्यालय, मुंबई